तहसिलदार संवर्गातील ०२ परिविक्षाधीन उमेदवारांच्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०२२/प्र.क्र.०२/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ मार्च, २०२४.

**संदर्भ**:-१) शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/०२/२०१६.

२) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय,क्र.टिआरएन-०५१६/प्र.क्र.८४/१२अ,दिनांक २०/१/२०१४

३) सा.प्र.,कार्यालयीन आदेश,क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/सीपीटीपी-अ,दि.२४/१२/२०२१.

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०२१/प्र.क्र.०२/ई-८,दिनांक १३/०१/२०२२.

५) सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश, क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/ सीपीटीपी-अ, दि.१३/०१/२०२२ व दि.१४/०१/२०२२.

६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,समक्रमांक दिनांक २२/०२/२०२२

७) सामान्य प्रशासन विभाग,पत्र क्र. टिआरएन-२०२४/प्र.क्र.०५/प्रशि-२,दिनांक १८/०१/२०२४

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ संवर्गातील उमेदवारांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येते. राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या राज्यसेवा परीक्षा-२०१९ द्वारे सरळसेवेने नियुक्त झालेल्या गट -अ॰ संवर्गातील ७४ उमेदवारांकरीता उपरोक्त संदर्भ ०४ अन्वये अधिसंख्य पदे दोन वर्षाकरीता निर्माण करण्यात आली होती.

सामान्य प्रशासन विभागाने उपरोक्त संदर्भ क्र. ०५ अन्वये ज्या उमेदवारांचे तपासणी आणि पडताळणी प्रमाणपत्र अहवाल प्रलंबित होते, त्यापैकी श्री. माकोडे संदिप काशिनाथ यांची सीपीटीपी-७ अंतर्गत दिनांक १३/०१/२०२२ च्या आदेशान्वये परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली.

राज्यसेवा परीक्षा -२०१९ च्या शिफारस यादीमध्ये अनाथ आरक्षण प्रवर्गातील रिक्त जागावर पात्र उमेदवार न मिळाल्यामुळे त्यांच्या जागी गुणवत्तेनुसार शिफारसप्राप्त ठरलेल्या आणि अनाथ आरक्षण प्रवर्गातील नियुक्तीच्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई येथे दाखल मुळ अर्ज क्र. ३८०/२०२० सह संकिर्ण अर्ज क्र.२१३/२०२० श्रीमती अमृता करवंदे व इतर २ विरुध्द महाराष्ट्र शासन प्रकरणामध्ये मा. प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई यांनी दिनांक १५/०९/२०२० रोजी सदर दोन पदावर नियुक्ती देण्यासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यात येऊ नये, असे अंतरीम आदेश दिले होते. सदर आदेश विचारात घेता, त्यांना नियुक्ती देण्यात आली नव्हती. सदर प्रकरणी दिनांक १३/०१/२०२२ रोजीच्या सुनावणीअंती मा. न्यायाधीकरणाने सदर प्रकरणाची स्थगती उठवून मुळ अर्ज क्र ३८०/२०२० सह संकिर्ण अर्ज क्र.२१३/२०२० खारीज केलेला आहे. सदर आदेश विचारात घेता, श्री. आकाश राजाराम दहाडदे या उमेदवारास सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या दिनांक १४/०१/२०२२ च्या आदेशान्वये सीपीटीपी-७अंतर्गत परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली होती. आता, सदर प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यासाठी सेवाज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत परिविक्षाधीन अधिकारी सध्या ज्या ठिकाणी

जिल्हा संलग्नतेचे प्रशिक्षण घेत आहेत, त्या ठिकाणी त्यांना कार्यरत ठेवून तहसिलदार गट -अ॰ संवर्गातील ०२ परिविक्षाधीन वेतन अदा करण्यासाठी अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ च्या अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या व सामान्य प्रशासन विभागाने प्रशिक्षणांतर्गत कार्यक्रमासाठी नियुक्त केलेल्या "गट-अ॰ संवर्गातील श्री. माकोडे संदिप काशिनाथ व श्री. आकाश राजाराम दहाडदे या ०२ शिफारसप्राप्त ठरेलेल्या उमेदवारांना तहसिलदार, परिविक्षाधीन अधिकारी यांच्यासाठी ०२ अधिसंख्य पदे दि.१७/०१/२०२२ ते दि.१६/०१/२०२४ या दोन वर्षाच्या कालावधीकरीता निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात आली होती.

आता, सदर प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांसाठी सेवाज्येष्ठतेनुसार संवर्ग वाटप होईपर्यंत परिविक्षाधीन अधिकारी सध्या ज्या ठिकाणी जिल्हा संलग्नतेचे प्रशिक्षण घेत आहेत, त्या ठिकाणी त्यांना कार्यरत ठेवून सदरहू ०२ परिविक्षाधीन तहसिलदार यांच्या अधिसंख्य पदांना दिनांक १७/०१/२०२४ ते दिनांक ३०/०६/२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू ०२ परिविक्षाधीन तहसिलदार यांच्या अधिसंख्य पदांच्या वेतनावरील होणारा खर्च परिविक्षाधीन उमेदवार जिल्हानिहाय प्रशिक्षणासाठी वर्ग केलेल्या जिल्ह्याकरिता "मागणी क्र. सी-१, २०५३- जिल्हा प्रशासन (००) (०९३) जिल्हा आस्थापना (०१) सर्व साधारण आस्थापना (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८)/ आयुक्त नाशिक (२०५३ ००४६) / आयुक्त पुणे (२०५३ ००६४)/ आयुक्त अमरावती (२०५३ ००८२)/ आयुक्त नागपूर (२०५३०१०८)/आयुक्त छत्रपती संभाजीनगर (२०५३ ०१२६) या लेखाशिर्षाखालील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि- २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०/०२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२६१२२८५०६८१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHRIRAM DATTATRAYA YADAV

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50CB0CE4CC4FE54C74F42B860354E86EC00B3B36F5F215C9F7658E611006A200, cn=SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2024.03.26 12:51:07 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

६. जिल्हा कोषागार अधिकारी,(सर्व)
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई - ३२.
९. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग ( सीपीटीपी-ब), मंत्रालय, मुंबई - ३२.
१०. सह सचिव / उप सचिव (कार्यासन ब-१/ ई-९) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
११. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.